**आर्थिक वर्ष सन २००९-१०**
**मागणी क्र. बी -७,**
**मुख्य लेखाशिर्ष ३०५१, बंदरे व दिपगृहे**
**(३०५१ ०७३२) अंतर्गत अनुदान वितरण**
**करण्याबाबत.**

**शासन निर्णय**
**गृह विभाग**
**शासन निर्णय पीएलएन ०११०/ प्र क्र २९ / बंदरे -२,**
**मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२, दिनांक ०८ मार्च, २०१०.**

**वाचा :-** १) शासन निर्णय, गृह विभाग, क्र. पीडीई ०६०६/प्र क्र १२/बंदरे-२, दिनांक १० ऑक्टोबर, २००६.
२) मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड, मुंबई यांचे आदेश क्र. ममेबो/साअधिस/प्र.मा./५३४, दिनांक ६ ऑगस्ट, २००९.

**प्रस्तावना :-**

बंदरातील गाळ उपसणीसाठी सन २००९-१० या आर्थिक वर्षाकरीता मागणी क्र. बी-७, लेखाशिर्ष ३०५१ - बंदरे व दिपगृहे, १९०, सार्वजनिक क्षेत्र व इतर उपक्रम यांना सहाय्यक अनुदान, ०२ लहान बंदरे, (०१) (०५) बंदरातील मरीव गाळ उपसणे व सर्वेक्षण (राज्य) (योजनांतर्गत) (३०५१ ०७३२) या लेखाशिर्षाखाली रु. १००१.६७ लक्ष निधी अर्थसंकल्पीत करण्यात आला आहे. हा निधी लेखानुदान रु. १.६७ लक्ष व जुलै २००९ च्या पावसाळी अधिवेशनातील पुरवणी मागणी रु. १००० लक्ष असा दोन टप्प्यात मंजूर झालेला आहे.

महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डाची नवीन कामे व उपकरणे यांच्या संदर्भात खर्च करण्यासाठी वित्तिय अधिकार, उपरोक्त "वाचा" येथील क्र. १ येथील दि. १०.१०.२००६ च्या शासन निर्णयान्वये महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डास प्रदान करण्यात आले आहेत. या वित्तिय अधिकारांच्या मर्यादेत मार्वे बंदर जिल्हा मुंबई उपनगर येथे कॅपिटल ड्रेजिंगव्दारा गाळ काढण्याच्या रु. ६४०.३७ लक्ष खर्चाच्या कामास बोर्डाचे मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी वरील "वाचा" येथील क्र. २ मधील दि. ६.८.२००९ च्या आदेशान्वये प्रशासकीय मान्यता दिलेली आहे.

या प्रयोजनासाठी अर्थसंकल्पामध्ये मंजूर झालेले अनुदान महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डाला वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुसार पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

मार्वे बंदर जिल्हा मुंबई उपनगर येथे कॅपिटल ड्रेजिंगव्दारा गाळ काढण्याच्या कामासाठी सन २००९-१० या आर्थिक वर्षामध्ये अर्थसंकल्पित झालेल्या रु. १००१.६७ लक्ष तरतुदीपैकी रु.६,४०,३७,०००/- (अक्षरी रुपये सहा कोटी चाळीस लक्ष सदतीस हजार फक्त) इतका निधी महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डास वितरीत करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

२. या प्रयोजनासाठी उपरोक्त निधी, अर्थसंकल्प वितरण प्रणाली (BDS) च्या माध्यमातून संगणकाव्दारे वितरीत करण्यात येत आहे.

३. या प्रयोजनासाठी होणारा खर्च " मागणी क्रमांक बी-७, लेखाशिर्ष ३०५१ - बंदरे व दिपगृहे, १९०, सार्वजनिक क्षेत्र व इतर उपक्रम यांना सहाय्यक अनुदान, (०२) लहान बंदरे, (०१) महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डास सहाय्यक अनुदान, (०१) (०५) बंदरातील भरीव गाळ उपसणे व सर्वेक्षण (राज्य) (योजनांतर्गत) (३०५१ ०७३२)" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा. तसेच सदर खर्च सन २००९-१० या आर्थिक वर्षातील उपलब्ध तरतूदीमधून भागविण्यात यावा.

४. उपरोक्त तरतूद खर्च करण्यासाठी मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड, मुंबई यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.

५. प्रस्तुत शासन निर्णय, नियोजन व वित्त विभागाच्या सहमती नुसार वित्त विभागाचा अनौपचारीक संदर्भ क्रमांक ७१/१०/व्यय-८, दि. २३ फेब्रुवारी, २०१० अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या http://www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर अपलोड करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्र. २०१००३०८१८००३८००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

(स.ज. तिडके)

**कार्यासन अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन.**

प्रत,

महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परिक्षा), मुंबई
महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परिक्षा), नागपूर
अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
निवासी लेखा अधिकारी, मुंबई.
मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड, मुंबई (५ जादा प्रतींसह)
वित्त विभाग (व्यय-८/ अर्थसंकल्प -११), मंत्रालय, मुंबई-३२
अवर सचिव, बीयुडी-१, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२
नियोजन विभाग, (का. १४६१), मंत्रालय, मुंबई - ३२
निवडनस्ती (बंदरे-२)